**मौजे. खडकेश्वर ( ता.अंबड जि.जालना ) या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१३/२०१४/प्र.क्र.२७७/पापु-१८**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२**
**दिनांक ०५ ऑगस्ट,२०१५**

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. ग्रापापु-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७/दि.१७.०३.२०१०.
२) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.०९/१०/२०१३
३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.
४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/ प्र.क्र.२२/ पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.
५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/ प्र.क्र.५२/पापु-७/ दि.१७.१०.२०१४
६) ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांना प्रशासकीय खर्चासाठी अनुज्ञेय असलेल्या निधीबाबत सुधारीत निर्देश, शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दि.२०.२.२०१५
७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या दरडोई खर्चाच्या निकषात सुधारणा करण्याबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.८१/पापु-०७, दि.२७.३.२०१५
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांचे पत्र क्र. जिपजा/ ग्रापापुवि/ प्रशा/१९९७/२०१४,दिनांक १९.१२.२०१४.
९) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो १११४/ प्र.क्र.६१/पापु-०७, दि.१५.६.२०१५.
१०) अ.शा.पत्र क्र. पापुशा/प्र.क्र.१६६/२०१५/वासो-०१, दिनांक १३.७.२०१५

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे.खडकेश्वर ( ता.अंबड जि.जालना ) या नळ पाणी पुरवठा योजनेचा रु.५५,७२,०३६/ निव्वळ किंमतीचा व त्यावर ९% प्रशासकीय खर्च धरुन रु.६०,७३,६००/- एवढया ढोबळ किंमतीच्या प्रस्तावास कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद जालना यांनी दि. १२.११.२०१४ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च विहीत निकषापेक्षा जास्त असल्याने जिल्हा परिषदेने सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी संदर्भ क्र.८ अन्वये शासनास सादर केला आहे. संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयानुसार जिल्हा परिषदेकडील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी प्रत्यक्ष कामाच्या खर्चाच्या

रकमेच्या अधिकतम ४% मर्यादेपर्यंतचा खर्च प्रशासकीय कामासाठी अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे. त्यामुळे वाढीव दरडोई खर्च असलेल्या मौजे.खडकेश्वर ( ता.अबंड जि.जालना ) या नळ पाणी पुरवठा योजनेस निव्वळ किंमतीच्या म्हणजेच (रु. ५५,७२,०३६/- अधिक ४% प्रशासकीय खर्च रु.२,२२,८८१/- धरुन रु. ५७,९४,९१७/- ) रु. ५७,९५,०००/- एवढया ढोबळ किंमतीस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय :-</u>

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे.खडकेश्वर ( ता.अंबड जि.जालना ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ४०३०/- एवढया दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. **५७,९५,००० /-** (रुपये सत्तावन्न लाख पंच्यान्नव हजार फक्त) इतक्या **ढोबळ** किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास **प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

२. संदर्भाधिन अनु क्र.४ मधील शासन निर्णयाद्वारे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे.

३. **सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-**

१) संदर्भीय क्र. १० च्या शासन पत्रान्वये निर्गमित केलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद, जालना यांची राहील.

२) सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिति यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्विरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती **ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधिन अनु.क्र. ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे संबधित कंत्राटदारामार्फत** करण्यात यावी.

३) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार खाजगी नळ धारक पाणी पट्टीचा दर सुरुवातीच्या काळात **किमान रु. १०००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढा निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जालना यांनी ग्रामसभेद्वारा करावी.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४) योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

५) ज्याप्रकरणी जलसंपदा विभागाची पाणी उचलण्याची परवानगी आवश्यक आहे, त्याप्रकरणी परवानगी/आरक्षण प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करु नये.

६) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७) गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) दरडोई खर्चाच्या निकषात योजना नसल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत योजनेची कामे मंजूर किंमतीतच पुर्ण करावी. त्यासाठी योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

९) योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत व उदभव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

१०) जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नये.

११) अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१२) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

१३) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची , राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र. १ व ३ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक सुचनांनुसार पुर्तता करण्यात यावी.

१४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी संदर्भात वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद जालना यांची राहील.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिश्श्याची तरतूद राज्यस्तर तसेच जिल्हा परिषद जालना यांनी त्यांना जिल्हा नियोजन समितीमार्फत उपलब्ध होणाऱ्या निधीमधून करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०५१५५११३२६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangar Vandana S

Digitally signed by Sangar Vandana S
DN: c=IN, o=Govt. of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Sangar Vandana S
Date: 2015.08.05 15:53:50 +05'30'

**(वंदना सनगर )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व मा .विधानसभा/विधानपरिषद सदस्य .
३) प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
४) महालेखापाल,महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).

५) महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६) विभागीय आयुक्त,औरंगाबाद.
७) सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
८) जिल्हाधिकारी,जालना.
९) संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जालना.
११) संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१२) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा जालना.
१३) अधिक्षक अभियंता,भारत निर्माण कक्ष,विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, जालना.
१५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासने पापु-०४, ०६, ०७, ०९, १०, १३ व १७
१६) निवडनस्ती पापु-१८.